# अनारकोचा पाचवा दिवस

## लेखक: सत्यु

## अनुवाद: मानसी महाजन

... तिला वाटतंच होतं, की आत्ता जमिनीला भेगा पडतील, जमीन दुभंगेल आणि त्यातून चिमण्यांचा थवाच्या थवा उडत बाहेर पडेल. तिला वाटतंच होतं की आता खरी मजा येणार आहे....तेवढ्यात आईने तिला हलवले, "अन्नो, चल उठ! परीक्षेची तयारी करायची आहे, चल अभ्यासाला बस." झोपेत असल्यामुळे अनारकोला आईचा आवाज खूप लांबून येत असल्यासारखा वाटला. तो आवाजही स्वप्नाचाच भाग असावा असं वाटलं. पण आईने तिला पुन्हा गदागदा हलवलं आणि तिला दचकून जाग आली. आळस देत म्हणाली, "आई, मी नाही परीक्षेची तयारी करणार."

"का बरं! का नाही करणार? जाऊन बघ, गोलू, बिट्टू, फुलपत्ती सगळे अभ्यासाला बसले आहेत."

अनारकोने मान वाकडी करून आईकडे बघत विचारलं, "बरं आई, मला एक सांग, त्या सर्वांनी तयारी केली,अभ्यास केला, तर काय होईल?" आईकडे उत्तर तयारच होतं - "मग ते सगळे पास होतील आणि तू नापास!" अनारको जांभई देत म्हणाली, "बरं आई, पास होऊन ते सगळे काय करतील?"

आई - "पुढच्या वर्षी पुन्हा छान अभ्यास करतील आणि पुन्हा पास होतील. "

अनारको - "मग काय करतील?"

आई - "मग त्याच्या पुढच्या वर्षी पुन्हा अभ्यास करतील आणि परत पास होतील."

अनारको - "मग काय करतील?"

आई - "असे पास होत होत पुढे जातील आणि त्यांना चांगली नोकरी मिळेल. "

अनारको - "मग काय करतील?"

आई - "मग त्यांच्याकडे गाड्या, बंगले, नोकर-चाकर असतील.. "

अनारकोने आईला मध्येच थांबवलं. "पण आई, हे सगळं असेल, मान्य आहे, पण ते करतील काय?"

आई आता चांगलीच वैतागली होती. डोक्यावर हात मारून थोडी रागावून म्हणाली, "काय करणार म्हणजे काय, खाऊन पिऊन सुखी होतील, आरामात राहतील, काम करतील. झोपतील... "

अनारकोने पुन्हा आईला मध्येच थांबवलं आणि पटकन म्हणाली, "अगं आई, हे सगळं मी नापास होऊन सुद्धा करूच शकते ना!" या उत्तराने आई चांगलीच गडबडली. गडबडून म्हणाली, "नापास होऊन हे सगळं कसं करशील?" अनारकोने हात हनुवटीखाली धरले आणि सांगू लागली, "नापास झाल्यावर मी अभ्यास सोडूनच देईन. मग मी दुकानातून खूप फुगे घेऊन येईन. त्यांना फुगवून दोरीने बांधेन. मग एक उंच काठी घेऊन, त्याला दुसरी लहान काठी आडवी बांधेन, आणि त्या आडव्या काठीवर सगळे फुगे लटकवून ठेवेन. मग इकडे तिकडे फिरून मी ते फुगे विकेन. हे तर झालं माझं काम. फुगे विकून जे पैसे मिळतील, त्यातून चणे-चुरमुरे विकत घेऊन खाईन. संध्याकाळी खेळेन आणि रात्री झोपून जाईन - बास!" अनारकोने आनंदात टाळी वाजवली.

इकडे आई तर पूर्णच चक्रावून गेली. दोन्ही हातांनी तिने अनारकोला खांद्याला घट्ट पकडलं आणि घाबरून म्हणाली, "अगं वेडे! तुला काही समजतं आहे का काय बडबडते आहेस ते! तुला कल्पना आहे का तुला काय करायचं आहे याची?"

अनारकोने शांतपणे आईचे हात खांद्यावरून  बाजूला केले. "आई, कोणालाच माहित नसतं काय करायचं आहे हे. काही न काही करायचं आहे एवढं माहित असतं, म्हणून काही न काही करत असतात."

तुम्हाला खरं वाटणार नाही, पण आई आता अजूनच चक्रावली. एवढी चक्रावली की तिच्या तोंडातून शब्दच फुटेना. अनारकोने विषय बदलत विचारलं, "बरं आई, मला सांग, हे कोण ठरवतं की काही जणांनी पास व्हायचं आणि काहींनी नापास?"

आई सावरून म्हणाली - "ठरवत असतील कोणीतरी!"

अनारको - "आता असं सांग, कोणीतरी पास होणार आणि कोणीतरी नापास, हे ठरवणं का गरजेचं आहे?"

आई - "कोण जास्त चांगलं, कोण जास्त हुशार हे कळण्यासाठी."

दुसरा एक प्रश्न विचारणं अत्यंत गरजेचं आहे हे अनारकोला समजलं. तिने विचारलं, "आई, हे कोणी ठरवलं की शाळेत परीक्षा असायला हव्यात?"

आईचे अगदी क्षीण उत्तर आले - "ठरवत असतील कोणीतरी.. "

पूर्वी एकदा एका वेगळ्या गोष्टीसाठी आईने हेच वाक्य म्हंटल्याचं अनारकोला आठवलं. थोडी वैतागून म्हणाली, "काय गं आई सारखं - ठरवत असतील कोणीतरी - असं म्हणतेस! मागे मी तुला विचारलं होतं की हे कोणी ठरवलं की बाबा सहा दिवस ऑफिस ला जाणार आणि एक दिवस सुट्टी वर असणार, तेव्हां सुद्धा असंच म्हणाली होतीस - ठरवत असतील कोणीतरी." आई जरा उदास दिसू लागली. अनारकोला वाटले आपण उगाच चिडलो. "बरं ते जाऊदे. मी तुला त्या दिवशीची एक गोष्ट सांगते, परीक्षेची गोष्ट." विषय बदलल्यावर आईचं मन तिच्या चेहेऱ्याप्रमाणेच खुललं आहे हे अनारकोला जाणवलं. आई लक्ष देऊन ऐकत असल्यामुळे तिने लागलीच विचारलं - "कोणता दिवस? कोणती गोष्ट?"

अनारको - "त्या दिवशीची गोष्ट."

आई - "कधीची? कोणत्या तारखेची?"

अनारको - "अगं आई! तारीख सांगितली तर गोष्ट जास्त चांगली समजेल का तुला?"

आई मोठ्ठा श्वास सोडत म्हणाली - "बरं सांग, काय झालं त्या दिवशी?"

अनारको - "मी जंगलात गेले होते. "

आई - "कोणतं जंगल? नाव काय त्या जंगलाचं?"

अनारको  - "जंगलाचं नाव सांगणं महत्वाचं आहे का? तू फक्त त्या दिवशीची गोष्ट ऐक. "

अनारको आवरून सावरून ऐस पैस पलंगावर बसली आणि सांगू लागली -

तेव्हां जंगलात खूप प्राणी असायचे - वाघ, चित्ता, गेंडा, बकरी, उंट, म्हैस, हरीण, ससा, असे सगळेच प्राणी जंगलात राहायचे. सगळे गुण्यागोविंदाने एकत्र राहायचे. एक दिवस एक माणूस जंगलात आला आणि विचारू लागला,

"सांगा पाहू, तुमच्यापैकी सर्वात उत्तम प्राणी कोणता?" प्राणी म्हणाले, आम्ही सगळेच उत्तम आहोत. कोणी उत्तम गाणी म्हणते, कोणी उत्तम पळते, कोणी उत्तम पोहोते तर कोणी झाडावर चढण्यात उस्ताद आहे. हे ऐकून माणसाचा चेहेरा कसनुसा झाला. त्यानी त्याच्या पोतडीतून एक धातूचा डबा बाहेर काढला आणि त्यावरचं एक बटण दाबलं. मग काय झालं माहित्ये का! डब्यातून निळा निळा धूर येऊ लागला, भसाभस येऊ लागला. जमिनीला लागून पसरत पसरत तो धूर जंगलाजवळ येऊ लागला. जंगलात पोहोचल्यावर धूर झाडांवर चढू लागला, झाडांमध्ये घुसू लागला, पानांवर पसरू लागला आणि बघता बघता पूर्ण जंगल निळ्या धुराने भरून गेलं. तो माणूस आपली पोतडी घेऊन तिथून निघाला. जाता जाता एक कुत्सित हसू मात्र मागे सोडून गेला. थोड्या वेळाने सगळा धूर जमिनीत शोषल्याप्रमाणे नाहीसा झाला, आणि जंगल पुन्हा स्वच्छ झालं. पण आता सगळे प्राणी ओरडू लागले, "मी सर्वोत्तम प्राणी आहे", आणि एकमेकांना फुशारक्या मारत सांगू लागले, "मी तुझ्यापेक्षा उत्तम प्राणी आहे!" खूप गदारोळ माजला. तेवढ्यात प्राण्यांना एक बगळा दिसला. तो मासे पडकण्यासाठी शांतपणे नदीवर निघाला होता. प्राण्यांनी त्याला हाक मारली, त्याला थांबवलं आणि म्हणाले, "बगळे महाराज, तुम्हीच ठरवा आमच्यापैकी कोण सर्वोत्तम प्राणी आहे?" बगळा थांबला, वर आकाशाकडे एकटक नजर लावून उभा राहिला. थोड्या वेळानी म्हणाल, "ठीक, चला सांगतो." प्राण्यांनी बगळ्याचे चांगले स्वागत केले.

बगळ्याने आपले पंख फडफडावले तसे सगळे प्राणी येऊन त्याचा अवतीभवती जमिनीवर बसले. बगळा अजूनही एकटक आकाशाकडे पाहत होता. बगळ्याच्या नजरेत भरण्याच्या प्रयत्नात सगळे प्राणी एकमेकांना धक्का बुक्की करत होते, जणू म्हणत होते, "बगळे महाराज, मी इथे आहे, तुम्ही मला तिकडे आकाशात का बरं शोधत आहात?" बगळ्याने पुन्हा एकदा पंख फडफडावले आणि मान खाली करून गंभीर आवाजात बोलू लागला - "मी तुम्हाला तिथे शोधत नव्हतो, जरा आकाश बघत होतो." सर्व प्राणी आपल्या समोरच्या दोन पायांवर हनुवटी टेकवून, पुढे झुकून, कान देऊन बगळ्याचे बोलणे ऐकू लागले. सर्वांचे डोळे चमकत होते, म्हणत होते - "तुम्ही आ-का-श पाहत होतात" जणू बगळा काहीतरी फार महान काम करत असावा. बगळा मान खाली घेऊन पुन्हा बोलू लागला - "चला, निर्णय घेऊया."

सगळे प्राणी एकदम चिडीचूप झाले, आणि चमकणाऱ्या डोळ्यांनी बगळ्याकडे पाहू लागले. बगळ्याने सर्व प्राण्यांवर नजर टाकली, एकदा डावीकडून उजवीकडे, मग उजवीकडून डावीकडे. मग पुन्हा आकाशाकडे पाहू लागला. त्याने एका पायावर दुसरा पाय टेकवला आणि बराच वेळ आकाशाकडे टक लावून पाहत बसला. प्राण्यांना वाटलं, झालं, आता हा बराच वेळ तंद्री लावून बसणार. प्राणी बसल्या जागी चुळबुळ करू लागले. थोड्या वेळात त्यांची चुळबुळ चांगलीच वाढली. चुळबुळ वाढलेली पाहून पाय सरळ करत बगळा म्हणाला, "माझ्या मते हरीण आणि म्हैस हे सर्वात उत्तम प्राणी आहेत."

हे ऐकून प्राण्यांमध्ये एकाच खळबळ माजली. हरीण आणि म्हैस वगळता, इतर सर्व प्राणी गोंगाट करू लागले, इकडे तिकडे येरझाऱ्या घालू लागले. हरीण आणि म्हैस कोपऱ्यात उभ्या उभ्या लाजून लाल झाले होते. म्हैस तर लाजून लाजून जांभळी पडली होती. इकडे प्राण्यांचा गोंधळ सुरूच होता. "अन्याय, हा अन्याय आहे!" थोड्या वेळाने जरा गोंगाट कमी झाल्यावर चित्ता पुढे आला - "हरीण कसं काय सर्वोत्तम असे शकतं? मी त्याच्यापेक्षा भारी आहे, कारण मी त्याच्यापेक्षा जोरात धावू शकतो!" गाढव म्हणाला, "माझा आवाज तर म्हशीच्या आवाजापेक्षा मोठा आहे, जास्त लांबवर पोहोचू शकतो. मी म्हशीपेक्षा भारी आहे." आणि आपला मुद्दा पटवून देण्यासाठी गाढव जोरजोरात रेकू लागले. गेंड्याचा हल्लीच एक मजेशीर किस्सा झाला होता. त्याला एकच शिंग होतं, आणि ते दिसायला अगदी नाकासारखं होतं. गेंड्याला सुद्धा समजायचं नाही, हे आपलं नाक आहे का शिंग? तर एकदा असंच पाऊस पडत असताना गेंड्यानी एक झाड पाडण्यासाठी त्यावर जोरात धडक दिली होती, आणि नाक (जे खरं तर शिंग होतं) वाचवण्याच्या नादात आपले सगळे दात मात्र तोडून घेतले होते. त्यामुळे झालं असं

होतं, की गेंड्याला 'स' म्हणता येत नसे. पण तो काही गप्प बसणाऱ्यांपैकी नव्हता. पुढे येऊन बोलू लागला, "हरणाला दोन 'फिंग' अफली तरी काय झालं? माझं एक फिंग त्याच्या दोन फिंगांपेक्षा जाफ्त मजबूत आहे. मग मीच फरवात भारी आहे!" उंट जोरजोरात मान हलवून बोलू लागला, "मी म्हशीपेक्षा चांगला रवंथ करून दाखवू शकतो, दाखवू का आत्ताच? मीच आहे सर्वात भारी प्राणी." सगळे प्राणी बोलत सुटले होते. बगळा त्यांच्याकडे असा काही पाहत होता जणू त्याला काही ऐकूच येत नसावे. हळू हळू सगळे शांत झाले.

बगळा म्हणाला, "तुम्ही सर्वांनी सर्वात भारी प्राणी ठरवण्याची जबाबदारी मला दिली होती ना?"

काही प्राणी वगळता इतरांनी मान डोलावली.

बगळा पुढे बोलू लागला, "मग मी माझ्या परीने ठरवणार, बरोबर ना?"

काही प्राण्यांनी पुन्हा मान डोलावली. इतर प्राण्यांना मात्र एवढ्या लगेच बगळ्याचे ऐकायला नको असे वाटत होते. बगळा पुढे बोलू लागला, "माझ्या परीने ठरवायचे झाले तर ज्या प्राण्यांचा मला सर्वत जास्त उपयोग होतो तेच मी उत्तम ठरवणार!"

"हो, हो" प्राणी म्हणाले.

"हरीण आणि म्हैस यांच्यापासून मला सगळ्यात जास्त फायदा आहे, म्हणून ते सर्वात भारी प्राणी!" बगळा पटकन म्हणाला.

आता मात्र प्राण्यांनी मान डोलावली नाही. "कसं काय? हरीण आणि म्हैस यांचा काय उपयोग आहे तुला?" त्यांनी विचारले. बगळा थोडा विचार करून म्हणाला, "हरीण मला कधीच त्रास देत नाही. तोच एक असा प्राणी आहे जो पाणी पिण्यासाठी नदीवर जात नाही. त्यामुळे मी मासे पकडत असताना तो तिथे येऊन मासे पळवून लावत नाही. आणि म्हशीचा पण मला उपयोग होतो. ती नदीत किंवा तलावात डुंबत असते तेव्हां मी तिच्या पाठीवर उभा राहून मासे पकडू शकतो."

इतर प्राण्यांना हे काही पटलं नाही. हरीण आणि म्हशीचा उर मात्र अभिमानाने फुलून आला होता. प्राण्यांनी हरणाला विचारलं, "काय रे हरणा, तू का नाही जात नदीवर पाणी प्यायला?" बोलण्यासाठी हरणांची तोंड उघडताच छातीत भरलेली सगळी हवा फुस्स झाली आणि हरीण एकदम पिचकलेलं दिसू लागलं. तोल सावरून बोलू लागलं, "जायचो ना पूर्वी. पीत होतो नदीतलं पाणी. पण नंतर का कोण जाणे, माणसं म्हणू लागली की हरीण फक्त दवबिंदू चाटून तहान भागवतं. ही अफवा सगळीकडे पसरली. आता तुम्हीच सांगा, असं असताना मी कोणत्या तोंडाने नदीवर पाणी प्यायला जाणार? बसलो चाटत दवबिंदू. इतका वेळ वाया जातो म्हणून सांगू, आणि तहान तर भागातच नाही. पण काय करणार, मी जसं दिसणं अपेक्षित आहे तसंच मला दिसावं लागणार ना!" हे ऐकून प्राण्यांना समजलं की हरणाने खूप महत्वाची गोष्ट सांगितली आहे. सगळे प्राणी थोडा वेळ गप्प झाले. झोपले की काय असे वाटत असताना गेंडा एकदम जागा होऊन ओरडला, "बगळे महाराज, तुम्ही म्हफीवरच का बफता? दुफऱ्या प्राण्यांवर का नाही बफत?" बाकी प्राणी सुद्धा ओरडू लागले, "हो हो, म्हशीवरच का? आमच्यावर का नाही?" या अनपेक्षित प्रश्नामुळे बगळा गोंधळला. मग थोडा सावरून, थोडा लाजत म्हणाला, "म्हशीच्या काळ्या पाठीवर माझं गोरं गोरं अंग उठून दिसतं ना, म्हणून!"

हे ऐकून प्राण्यांची अशी अवस्था झाली, जणू ऐकायचं होतं "मदरास" आणि ऐकू आलं "डेहराडून". एकदम चूप झाले. प्राण्यांना काही समजायच्या आत बगळा तिथून मोठ्या मोठ्या ढांगा टाकत निघून गेला.

"मग काय, मी बगळ्याकडे बघत राहिले. बगळा मासे पडकू लागला तशी मी तिथून निघून घरी आले." अनारकोने गोष्ट संपवली.

आई डोळे विस्फारून, आ वासून गोष्ट ऐकत होती. गोष्ट संपली तरी आईचा चेहरा तसाच होता. अनारकोने हळूच आईच्या गालाला स्पर्श केला. तिचा स्पर्श होताच आईचा चेहेरा एकदम बदलला. इतका बदलेल असं ठाऊक असतं, तर अनारकोने नसताच लावला हात. आई वैतागून म्हणाली, "वेडी कुठली. काय बोलते देव जाणे, दिवसा ढवळ्या स्वप्न बघत असते. आणि तुझ्या परीक्षेशी याचा काय संबंध?" अनारको लगेच म्हणाली, "आई तुला काहीच कसं समजत नाही, संबंध आहे तर. विचार कर थोडा!"

तिचं उत्तर ऐकून आई पुन्हा चक्रावली. आज आईचा चक्रावण्याचा दिवसच होता बहुदा. इकडे आई चक्रावली, तिकडे अनारको शाळेत जायची तयारी करू लागली. तिनी मनात हिशोब केला, आईला काही समजलं नसलं तरी आज अभ्यास करण्यापासून सुट्टी मिळाली आहे. तेवढ्या विचाराने अनारको खुश झाली.